औद्योगिक प्रशिक्षण संस्था,सोलापूर,जि.सोलापूर या जिल्हा स्तरावरील ५० वर्षापेक्षा जुन्या जीर्ण संस्थांच्या नुतनीकरणासाठी लागणा-या रु.२,१९,७९,४०२/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास मंजूरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,

शासन निर्णय क्रमांक प्रशामा-२०१०/(०६ /१०)व्यशि-२अर्थसं,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.

दि. १५ जून, २०१०.

संदर्भ :- व्यवसाय प्रशिक्षण संचालनालयाचे पत्र क्र.१५/सोलापूर/नुतनीकरण/२००९/६५४, दि.१७.१२.२००९.

**प्रस्तावना :-** औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सोलापूर, जि.सोलापूर ही संस्था १९६० या शैक्षणिक वर्षापासून सर्वसाधारण (जनरल) उपयोजनेखाली सुरु करण्यात आली आहे. या संस्थेत २४ व्यवसायांचे प्रशिक्षण देण्यात येत असून विद्यार्थी प्रवेश क्षमता ९१२ एवढी आहे. संस्थेकरीता सर्व्हे क्र.६०१ अ व ६०२ मधील १३.३७ हेक्टर शासकीय जमीन ताब्यात घेतलेली आहे. प्राप्त जमिनीवर संस्थेची कार्यशाळा व प्रशासकीय इमारत, वसतिगृह इमारत तसेच प्रथम, द्वितीय,तृतीय व चतुर्थश्रेणी कर्मचारी व अधिका-यांच्या निवासस्थानाच्या इमारती बांधण्यात आल्या आहेत. या व्यतिरिक्त मोठे क्रिडांगण, सायकल स्टँड इत्यादी बाबींची सुविधाही पुरविण्यात आलेल्या आहेत. संस्थेच्या इमारतीस ५० वर्षापेक्षा अधिकचा काळ झालेला आहे. शिल्प कारागिर योजना व सीओई अंतर्गत व्यवसाय अभ्यासक्रमास प्रवेश घेतलेल्या प्रशिक्षणार्थ्यांच्या प्रशिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठी इमारतीचे नुतनीकरण करणे गरजेचे आहे. इमारत बांधकामाच्या नुतनीकरणामध्ये प्रामुख्याने अंतर्गत रस्त्याचे नुतनीकरण, कार्यशाळा इमारतीमध्ये कॉंक्रीट फ्लोअरिंग,फरशी आवश्यक त्या ठिकाणी बांधकाम, गिलावा,रंगकाम, [illegible] छत, दरवाजे, खिडक्या, छतावरील पत्रे माहितीदर्शक फलके, पेव्हड ब्लॉक्स इ.बांधकामासाठी संस्थेच्या प्राचार्यांना कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, सोलापूर यांचेकडून रु.२,०१,३१,०९१/- एवढया किंमतीचे अंदाजपत्रक सा.बां.प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या कार्यालयाच्या जिल्हा दरसूचीवर आधारित तयार करण्यात आले आहे.

**<u>शासन निर्णय -</u>** औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सोलापूर,जि.सोलापूर या जिल्हा स्तरावरील ५० वर्षापेक्षा जुन्या संस्थेच्या नुतनीकरणासाठी लागणा-या **रु.२,१९,७९,४०२/-(दोन कोटी एकोणीस लाख एकोणऐंशी हजार चारशे दोन फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

१. उपभोक्ता विभाग म्हणून सदर अंदाजपत्रक व्यवसाय प्रशिक्षण संचालनालयातील संबंधीत जबाबदार अधिका-यांनी साक्षांकित करावे.

२. अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित आहे.

३. एस्केलेशन अदायगीसाठी १० टक्के तरतूद करण्यात येत आहे.

२. सदरच्या प्रस्तावावरील खर्च हा मागणी क्र.४२५०-इतर सामाजिक व सामुहिक सेवावरील भांडवली खर्च, २०१, कामगार शिल्प कारागिर प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनातंर्गत योजना,इमारती (००) (०१) मुख्य बांधकाम (४२५० ००१६) या अर्थशिर्षाखाली भागविण्यात यावा व त्यासाठी अर्थसंकल्पात योग्य ती तरतूद केल्या शिवाय बांधकाम सुरु करु नये.

३. प्रस्तुत आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र.१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम १९७८, भाग पहिला, उपविभाग ५, मधील अनुक्रमांक १ अन्वये सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४, अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार व सार्वजनिक बांधकामाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५५/इमारत ३, दि. ८.४.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक 201006171530410001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( सं.अ.बागेश्वर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत :
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई-१.
सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, सोलापूर
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, सोलापूर,जि.सोलापूर.
महालेखापाल - ॥ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई-१/ नागपूर-२
महालेखापाल - ॥ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई-१/नागपूर-२
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर (नकाशा व अंदाजपत्रकासह) (संचालक (प्रशिक्षण) यांच्यामार्फत
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
नियोजन/ वित्त विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती / व्यशि-२ अर्थसंकल्प.